**माहिती व जनसंपर्क महासंचालनालय व अधिनस्त कार्यालयांच्या आस्थापनेवरील गट-ड संवर्गातील पदे निरसित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक-मावज-२०१६/प्र.क्र.८२/(भाग-२)/३४-अ**

खोली क्र.६१४, मंत्रालय विस्तार इमारत,
हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- २३ जानेवारी २०१९.

**वाचा :** वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण -२०१५/प्र.क्र.५७/२०१५/विसु-१, दिनांक १४.०१.२०१६.

**शासन निर्णय :**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालय व अधिनस्त कार्यालयांच्या आस्थापनेवरील पदांच्या आकृतीबंधाच्या दि.२८.२.२००६ च्या शासन निर्णयानुसार गट-ड संवर्गात एकूण ३०६ पदे मंजूर आहेत. त्यात स्वच्छक-नि-शिपाई, संदेशवाहक, शिपाई, अंधार खोली सहायक, स्वच्छक-नि-हमाल, सायकल संदेशवाहक, मदतनीस, अंधार कोठडी सहायक, अशर, स्वच्छक-नि-सेवक, फिल्मशिपर, अर्धवेळ स्वच्छक इ. विविध पदांचा समावेश आहे. वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयानुसार गट-ड संवर्गातील पदे निरसित करणे आवश्यक आहे.

२. वित्त विभागाच्या शासन निर्णयास अनुसरुन माहिती व जनसंपर्क महासंचालनालय व अधिनस्त कार्यालयांच्या आस्थापनेवरील या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टात दर्शविलेली गट-ड संवर्गातील एकूण ३७ पदे या शासन निर्णयान्वये निरसित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१२३१२२९२६२४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: CN = Ramkisan Narayanrao Musale, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = General Administration Department
Date: 2019.01.23 12:45:43 +05'30'

**( रा.ना.मुसळे )**

अवर सचिव महाराष्ट्र शासन

**प्रती,**

१) सचिव (मावज), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई-३२.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.

६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

७) उप सचिव (३४-अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

८) उप सचिव, वित्त विभाग (आकृतीबंध पुनर्रचना कक्ष),मंत्रालय, मुंबई-३२.

९) संचालक (माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई-३२.

१०) उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई-३२.

११) कक्ष अधिकारी, वित्त विभाग(आकृतीबंध पुनर्रचना कक्ष),मंत्रालय, मुंबई-३२.

१२) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय,मुंबई.

१३) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी यांना, उपसंचालक, विभागीय माहिती कार्यालय, नवी मुंबई, कोल्हापूर, पुणे, नाशिक, औरंगाबाद, लातूर, अमरावती, नागपूर, गोवा यांचेमार्फत.

१४) निवडनस्ती.

## शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र.-मावज-२०१६/प्र.क्र.८२/(भाग-२)/३४-अ, दि. २३ जानेवारी २०१९ सोबतचे परिशिष्ट

| अ.क्र. | कार्यालय | रिक्त पदे | पदनाम | निरसित करावयाची पदे |
|---|---|---|---|---|
| | | | गट-ड मधील निरसित करावयाची पदे | |
| १ | कोकण | १२ | स्वच्छक-नि-शिपाई-१ (रायगड)<br>संदेशवाहक-१ (उ.मा.का.महाड)<br>शिपाई-१ (उ.मा.का.महाड)<br>शिपाई-१ (जि.मा.मा.रत्नागिरी) | ४ |
| २ | कोल्हापूर | ९ | अंधार खोली सहायक-१ (वि.मा.का.कोल्हापूर)<br>स्वच्छक-नि-हमाल-१(जि.मा.का.कोल्हापूर)<br>सायकल संदेशवाहक-१ (जि.मा.का.सिंधुदूर्ग) | ३ |
| ३ | पुणे | १४ | मदतनीस-१ (वि.मा.का.पुणे)<br>शिपाई-१ (वि.मा.का.पुणे)<br>सायकल संदेशवाहक-१ (जि.मा.का.सोलापूर)<br>शिपाई-१(जि.मा.का.सातारा) | ४ |
| ४ | नाशिक | ११ | अंधार कोठडी सहायक-१ (वि.मा.का.नाशिक)<br>शिपाई-१(उ.मा.का.मालेगाव)<br>स्वच्छक-नि-शिपाई-१ (जि.मा.का.अहमदनगर)<br>संदेशवाहक-१ (उ.मा.का.४०गांव-जळगांव) | ४ |
| ५ | औरंगाबाद | १२ | संदेशवाहक-१(संचालक(मा.), औरंगाबाद)<br>अशर-१ (मा.कें.औरंगाबाद)<br>शिपाई-१(जि.मा.का.औरंगाबाद)<br>स्वच्छक-नि-सेवक-१(जि.मा.बीड) | ४ |
| ६ | लातूर | ११ | शिपाई-१ (जि.मा.का.लातूर)<br>स्वच्छक-नि-सेवक-१ (जि.मा.का.उस्मानाबाद)<br>संदेशवाहक-१ (जि.मा.का.नांदेड) | ३ |
| ७ | अमरावती | ९ | संदेशवाहक-१ (वि.मा.का.-अमरावती)<br>संदेशवाहक-१(जि.मा.का.यवतमाळ)<br>संदेशवाहक-१ (उ.मा.का.खामगाव-बुलडाणा) | ३ |
| ८ | नागपूर | ११ | शिपाई-१(जि.मा.का.गडचिरोली)<br>शिपाई-१(जि.मा.का.वर्धा)<br>शिपाई-१(जि.मा.का.चंद्रपूर) | ३ |
| ९ | गोवा | ४ | स्वच्छक-१ (म.प.कें.गोवा),<br>शिपाई-१ (म.प.कें.गोवा) | २ |
| १० | मुख्यालय, मुंबई | ४५ | स्वच्छक-नि-हमाल-३ (मुंबई),<br>फिल्मशिपर-१ (मुंबई | ४ |
| ११ | इ.बी.पी. | ९ | अर्धवेळ स्वच्छक-२ (इ.बी.पी.) | २ |
| १२ | मा.कें.दादर | २ | स्वच्छक-१ (मा.कें.दादर) | १ |
| १३ | तांत्रिक कक्ष | १ | ० | ० |
| | **एकूण** | १५० | | **३७** |